॥ सन्न्यासाचे गीत ॥

॥ संन्याशाचें गीत ॥

भगवद्पूज्यपाद स्वामी विवेकानंदकृत

या सुप्रसिद्ध कवितेचा स्वामी मोक्षानंदकृत मराठी अनुवाद

जागव स्वन, जे गीत जन्मले गिरिगव्हरी दूर वनी
ऐहिकतेचा कधी गंधही पोचु न शकला ज्या विजनी
शांति जयाची भंगु न शकली कामसुखाची आस कधी
विचलित तिजला करू न धजला धन-कीर्तीचा श्वास कधी
चित्सत्याचा प्रवाह जेथे अखंड भावे झरझरला
आणि स्रोतही आनंदाचा दोहोपाठी झुळझुळला
निर्भय धीरा,हे संन्यासी, कर स्वन उदित महान
गा ते उदात्त अमृत गान ॐ तत्सत् ॐ ! ॥ १॥

तोड तुझी ती सर्व बंधने, करिति बद्ध तुला साची
काळ्या हिणकस धातूची वा लखलखणार्या हेमाची
प्रेम-द्वेष अन् शुभाशुभाची आणिक सगळ्या द्वंद्वांची
तोड तुझे ते सर्व पाश रे, जखडति तुजला जे साची
कुरवाळीले, ताडियले वा, दास कधीही मुक्त नसे
गुलाम संतत गुलाम असतो,जाणुन घे हे सत्य असे

कनकाच्या जरि असल्या बेड्या, दुर्बल नसती जखडाया
समर्थ त्याही बद्ध कराया, म्हणुनि जुगारी दूर तया
निर्भय धीरा, हे संन्यासी, कर स्वन उदित महान
गा ते उदात्त अमृत गान ॐतत्सत् ॐ ! ॥ २॥

अज्ञानाचे तिमिर जाउ दे, भुलवी तुज जे आभासे
-मंद स्फुरणे; उदासतेचे घनावरी घन रचितसे
जीवन-तृष्णा शमवी कायम; फरफट ओढी जीवाला
जन्मामागुनि मरणा नेई, मरणामागुनि जन्माला
अहं जिंकतो जो नर येथे, तोच जिंकतो सर्वाला
जाणुन घे या सत्याला अन् कधीही न वश हो ' मी ' त्वाला
निर्भय धीरा, हे संन्यासी, कर स्वन उदित महान
गा ते उदात्त अमृत गान ॐतत्सत् ॐ ! ॥ ३॥

जये पेरिले तोचि भोगि फळ, कारण कार्या प्रसवितसे
शुभापासुनी शुभची होते, अशुभापासुनि अशुभ तसे
नियमातुनि ह्या म्हणती ज्ञाते, ०क् कुणी कधीही सुटत नसे
जो कोणीही देह धारितो, बंधन त्याला लागतसे
असे सत्य हे; परंतु आत्मा नामरूपातीत असे
मुक्त असे तो सदा सर्वदा, अनुभव आता तत्त्वमसि
निर्भय धीरा, हे संन्यासी, कर स्वन उदित महान
गा ते उदात्त अमृत गान ॐतत्सत् ॐ ! ॥४॥

आई-बाबा पिता-पुत्र अन् पत्नी मित्रच हे नित्य
अशीच स्वप्ने बघती पोकळ, कळले त्याना नच सत्य
अलिंग आत्मा पिता कुणाचा, पुत्र कुणाचा अन् मित्र ?
शत्रु कुणाचा असू शके, जो अद्वय भावे सर्वत्र ?
सकल असे हा अखंड आत्मा, त्याहुन दुसरी नच सत्ता
विशुद्ध आत्मा  तत्त्वमसि , तू केवळ अनुभव हा आता
निर्भय धीरा, हे संन्यासी, कर स्वन उदित महान
गा ते उदात्त अमृत गान  ॐतत्सत् ॐ !  ॥ ५॥

आहे केवळ एकच आत्मा, ज्ञाता आणि मुक्त सदा
नाहि तयाला नाम-रूपही, अथवा कसली कलंकता
राहे त्यातच माया त्याची, पाहि स्वप्ने ही सारी
साक्षिरूप तो, भासतसे परि जीवन जगन्मय व्यवहारी
तूच अससि तो विशुद्ध आत्मा, अनुभव आता  तत्त्वमसि
विश्वव्यापी अतीत परि तो, जाणुन घे त्या स्वरूपासि
निर्भय धीरा, हे संन्यासी, कर स्वन उदित महान
गा ते उदात्त अमृत गान  ॐतत्सत् ॐ !  ॥ ६॥

कुठे शोधसी मुक्तीला तू, मित्रा, हिंडुनि बाहेरी ?
इह-परलोकहि समर्थ नाही मुक्ती द्यावया संसारी
व्यर्थच आहे तुझा शोध तो ग्रंथांवरि अन् देवगृही
निज हस्ते तू धरली दोरी, तीच ओढते तुज गेही
सोड तुझी ती पकड तीवरी, शमेल तेव्हा तळमळ ती

होईल अंत तुझ्या दुःखांचा, हृदयी येईल चिर-शांती
निर्भय धीरा, हे संन्यासी, कर स्वन उदित महान
गा ते उदात्त अमृत गान ॐतत्सत् ॐ ! ॥ ७॥

तव हृदयातुन बोल निघू दे, शांति मिळावी सकळास
भीति नसे ती माझ्यापासुन, स्थिरचर कोण्या जीवास
स्वर्लोकातील देवगणी अन् सरपटणार्या जीवात
' मी ' च असे तो अंतर्यामी आत्मा अवघा हृदयात
त्यजितो ' मी ' ती सर्व जीवने, इहपरलोकी जी असती
स्वर्गी भूतळी नरकांमध्ये बहुविध लोकी जी वसती
त्यजितो सार्या आकांक्षाही शंका संशय अन् भीती
कारण त्यांचा स्वभाव हा, की चित्ताला त्या भ्रमवीति
अशाप्रकारे आत्मबलाने तोड बंधने तव सारी
सुखदुःखांचे पाश सकळ हे बेड्या जणु या संसारी
निर्भय धीरा, हे संन्यासी, कर स्वन उदित महान
गा ते उदात्त अमृत गान ॐतत्सत् ॐ ! ॥ ८॥

जाओ राहो देह कसाही, विचार त्याचा नच व्हावा
कार्य तयाचे सरले आता कर्मप्रवाही तो जावा
कुणी अर्पु दे पुष्पहार वा लाथाडू दे देहाला
नको म्हणू तू काहिच कोणा, अंतरि जाणुन आत्म्याला
निंद्य निंदका, पूज्य पूजका अभेद लाभे ज्या स्थानी
स्तुति वा निंदा नसती तेथे, जाणुन राही शांत मनी

निर्भय धीरा, हे संन्यासी, कर स्वन उदित महान
गा ते उदात्त अमृत गान ॐतत्सत् ॐ ! ॥ ९॥

काम, नाम अन् धनाभिलाषा चित्ती ज्याच्या वसतात
प्रकट न होई प्रकाशमय ते सत्य तयाच्या हृदयात
जो कोणी निजपत्नी-भावे नारी-चिंतन करीतसे
सिद्ध कधीही तो नर नाही, जाणुन घे हे सत्य असे
अल्पही वस्तूमाजी ज्याला स्वामित्वाचा बोध असे
आणि क्रोधही ज्या व्यक्तीला बद्ध करूनी ठेवितसे
मायाजालामधुनी तो नर पार कधी नच जाउ शके
म्हणुनी यांना त्यजुनी बंधो, पूर्णपणे तू राहि सुखे
निर्भय धीरा, हे संन्यासी, कर स्वन उदित महान
गा ते उदात्त अमृत गान ॐतत्सत् ॐ ! ॥ १०॥

नको निकेतन तुझे स्वतःचे, राहि मोकळा तू आता
बद्ध कोण ते घर हे मित्र, तुजला करिते गुणवंता?
नील गगन हे छप्पर तूझे, तृणमय भूमी तव शय्या
दैववशे जे मिळे अन्न ते, पुरते देहा राखाया
शिजले, कच्चे असेल त्याचा विचार मुळिही मनी नसो
सदा वाहत्या नदीप्रमाणे मुक्त तुझा ' तू ' सदा असो
पाणी अथवा अन्न काहीही, त्या धीराला ना मळवी
जाणतसे जो स्वरूप अपुले, महान आत्मा तो मिळवी
निर्भय धीरा, हे संन्यासी, कर स्वन उदित महान

गा ते उदात्त अमृत गान  ॐतत्सत् ॐ !  ॥ ११॥

काहि अल्प जन सत्य जाणती, इतर द्वेश तव करतील
लक्ष न तिकडे द्यावे धीरा, जरी तुला ते हसतील
जागो-जागी भ्रमण करी तू, मुक्ता, तुज हे सहज घडे
साह्य करी बद्धांना जाण्या माया-मोहापलीकडे
देह-मनाच्या कष्टाची तू सोडुन देई भीति अता
मोद-सुखाचा शोध न घेई, करिसी कुणा जै सहायता
सुख-दुःखाच्या पार जाउनी अचल रहावे सदा मनी
परमात्म्याच्या प्राप्तीसाठी सेवारत तू होई झणी
निर्भय धीरा, हे संन्यासी, कर स्वन उदित महान
गा ते उदात्त अमृत गान  ॐतत्सत् ॐ !  ॥ १२॥

प्रारब्धाचा क्षय होई तो, निशिदिन ऐसा स्थिरवृत्ती
साधन करुनी अविचल भावे, दे जीवाला चिरमुक्ती
नंतर पुनरपि जन्मच नाही, कारण तेथे द्वैत नसे
' मी ' नाही अन् ' तू 'ही नाही, देव न मानव कोणि असे
आत्मरूप  मी च्क् सर्वच झालो, चिदानंदमय चिरवासी
अहं  असे हे  इदं  सर्वही जाणुन घेई  0क् तत्त्वमसि cक्
निर्भय धीरा, हे संन्यासी, कर स्वन उदित महान
गा ते उदात्त अमृत गान  ॐतत्सत् ॐ !  ॥ १३॥